बहु कर्कश बहु अशुभ। या नांव बद्ध ।।२३।।
बहु ग्रामणी बहु मत्सर। बहु असूया तिरस्कार ।
बहु पापी बहु विकार। या नांव बद्ध ।।२४।।
बहु अभिमान बहु ताठा। बहु अहंकार बहु फांटा ।
बहु कुकर्माचा सांठा। या नांव बद्ध ।।२५।।
बहु कापट्य वादवेवाद। बहु कुतर्क भेदाभेद ।
बहु क्रूइर कृपामंद। या नांव बद्ध ।।२६।।
बहु निंदा बहु द्वेष। बहु अधर्म बहु अभिळाष ।
बहु प्रकारीचे दोष। या नांव बद्ध ।।२७।।
बहु भ्रष्ट अनाचार। बहु नष्ट येकंकार ।
बहु आनित्य अविचार। या नांव बद्ध ।।२८।।
बहु निष्ठुर बहु घातकी। बहु हत्यारा बहु पातकी ।
तपीळ कुविद्या अनेकी। या नांव बद्ध ।।२९।।
बहु दुराशा बहु स्वार्थी। बहु कळह बहु अनर्थी ।
बहु डाईक दुर्मती। या नांव बद्ध ।।३०।।
बहु कल्पना बहु कामना। बहु तृष्णा बहु वासना ।
बहु ममता बहु भावना। या नांव बद्ध ।।३१।।
बहु विकल्पी बहु विषादी। बहु मूर्ख बहु समंधी ।
बहु प्रपंची बहु उपाधी। या नांव बद्ध ।।३२।।
बहु वाचाळ बहु पाषंडी। बहु दुर्जन बहु थोतांडी ।
बहु पैशून्य बहु खोडी। या नांव बद्ध ।।३३।।
बहु अभाव बहु भ्रम। बहु भ्रांति बहु तम ।
बहु विक्षेप बहु विराम। या नांव बद्ध ।।३४।।
बहु कृपण बहु खंदस्ती। बहु आदखणा बहु मस्ती ।
बहु असत्क्रिया व्यस्ती। या नांव बद्ध ।।३५।।
परमार्थविषईं अज्ञान। प्रपंचाचें उदंड ज्ञान ।
नेणे स्वयें समाधान। या नांव बद्ध ।।३६।।

परमार्थाचा अनादर। प्रपंचाचा अत्यादर ।
संसारभार जोजार। या नांव बद्ध ।।३७।।
सत्संगाची नाहीं गोडी। संतनिंदेची आवडी ।
देहेबुद्धीची घातली बेडी। या नाव बद्ध ।।३८।।
हातीं द्रव्याची जपमाळ। कांताध्यान सर्वकाळ ।
सत्संगाचा दुष्काळ। या नांव बद्ध ।।३९।।
नेत्रीं द्रव्य दारा पाहावी। श्रवणीं द्रव्य दारा ऐकावी ।
चिंतनीं द्रव्य दारा चिंतावी। या नांव बद्ध ।।४०।।
काया वाचा आणि मन। चित्त वित्त जीव प्राण ।
द्रव्यदारेचें करी भजन। या नांव बद्ध ।।४१।।
इंद्रियें करून निश्चळ। चंचळ होऊं नेदी पळ ।
द्रव्यदारेसि लावी सकळ। या नांव बद्ध ।।४२।।
द्रव्य दारा तेंचि तीर्थ। द्रव्य दारा तोचि परमार्थ ।
द्रव्य दारा सकळ स्वार्थ। म्हणे तो बद्ध ।।४३।।
वेर्थं जाऊं नेदी काळ। संसारचिंता सर्वकाळ ।
कथा वार्ता तेचि सकळ। या नांव बद्ध ।।४४।।
नाना चिंता नाना उद्वेग। नाना दुःखाचे संसर्ग ।
करी परमार्थाचा त्याग। या नांव बद्ध ।।४५।।
घटिका पळ निमिष्यभरी। दुश्चीत नव्हतां अंतरीं ।
सर्वकाळ ध्यान करी। द्रव्यदाराप्रपंचाचें ।।४६।।
तीर्थ यात्रा दान पुण्य। भक्ति कथा निरूपण ।
मंत्र पूजा जप ध्यान। सर्वही द्रव्य दारा ।।४७।।
जागृति स्वप्न रात्रि दिवस। ऐसा लागला विषयेध्यास ।
नाहीं क्षणाचा अवकाश। या नांव बद्ध ।।४८।।
ऐसें बद्धाचें लक्षण। मुमुक्षपणीं पालटे जाण ।
ऐक तेही वोळखण। पुढिलीये समासीं ।।४९।।
इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे बद्धलक्षणनाम

समास आठवा : मुमुक्षलक्षण

||श्रीराम ||

संसारमदाचेनि गुणें। नाना हीनें कुलक्षणें ।
जयाचेनि मुखावलोकनें। दोषचि लागे ||१||
ऐसा प्रणी जो कां बद्ध। संसारीं वर्ततां अबद्ध ।
तायस प्राप्त जाला खेद। काळांतरीं ||२||
संसारदुःखें दुखवला। त्रिविधतापें पोळला ।
निरूपणें प्रस्तावला। अंतर्यामीं ||३||
जाला प्रपंचीं उदास। मनें घेतला विषयत्रास ।
म्हणे आतां पुरे सोस। संसारींचा ||४||
प्रपंच जाईल सकळ। येथील श्रम तों निर्फळ ।
आतां कांहीं आपुला काळ। सार्थक करूं ||५||
ऐसी बुद्धि प्रस्तावली। पोटीं आवस्ता लागली ।
म्हणे माझी वयेसा गेली। वेर्थचि आवघी ||६||
पूर्वी नाना दोष केले। ते अवघेचि आठवले ।
पुढें येउनि उभे ठेले। अंतर्यामीं ||७||
आठवे येमाची यातना। तेणें भयेचि वाटे मना ।
नाहीं पापासि गणना। म्हणौनियां ||८||
नाहीं पुण्याचा विचार। जाले पापाचे डोंगर ।
आतां दुस्तर हा संसार। कैसा तरों ||९||
आपले दोष आछ्यादिले। भल्यांस गुणदोष लाविले ।
देवा म्यां वेर्थच निंदिले। संत साधु सज्जन ||१०||
निंदे ऐसे नाहीं दोष। तें मज घडले कीं विशेष ।
माझे अवगुणीं आकाश। बुडों पाहे ||११||
नाहीं वोळखिले संत। नाहीं अर्चिला भगवंत ।

नाहीं अतित अभ्यागत। संतुष्ट केले ।।१२।।
पूर्व पाप वोढवलें। मज कांहींच नाहीं घडलें ।
मन अव्हाटीं पडिलें। सर्वकाळ ।।१३।।
नाहीं कष्टविलें शेरीर। नाहीं केला परोपकार ।
नाहीं रक्षिला आचार। काममदें ।।१४।।
भक्तिमाता हे बुडविली। शांति विश्रांति मोडिली ।
मूर्खपणें म्यां विघडिली। सद्बुद्धि सद्वासना ।।१५।।
आतां कैसें घडे सार्थक। दोष केले निरार्थक ।
पाहों जातां विवेक। उरला नाहीं ।।१६।।
कोण उपाये करावा। कैसा परलोक पावावा ।
कोण्या गुणें देवाधिदेवा। पाविजेल ।।१७।।
नाहीं सद्भाव उपजला। अवघा लोकिक संपादिला ।
दंभ वरपंगें केला। खटाटोप कर्माचा ।।१८।।
कीर्तन केलें पोटासाठीं। देव मांडिले हाटवटीं ।
आहा देवा बुद्धि खोटी। माझी मीच जाणें ।।१९।।
पोटीं धरूनि अभिमान। शब्दीं बोले निराभिमान ।
अंतरीं वांछूनियां धन। ध्यानस्त जालों ।।२०।।
वित्पत्तीनें लोक भोंदिले। पोटासाठीं संत निंदिले ।
माझे पोटीं दोष भरले। नाना प्रकारींचे ।।२१।।
सत्य तेंचि उछेदिलें। मिथ्य तेंचि प्रतिपादलें ।
ऐसें नाना कर्म केलें। उदरंभराकारणें ।।२२।।
ऐसा पोटीं प्रस्तावला। निरूपणें पालटला ।
तोचि मुमुक्ष बोलिला। ग्रंथांतरीं ।।२३।।
पुण्यमार्ग पोटीं धरी। सत्संगाची वांछा करी ।
विरक्त जाला संसारीं। या नांव मुमुक्ष ।।२४।।
गेले राजे चक्रवर्ती। माझें वैभव तें किती ।
म्हणे धरूं सत्संगती। या नांव मुमुक्ष ।।२५।।

आपुले अवगुण देखे। विरक्तिबळें वोळखे ।
आपणासि निंदी दुःखें। या नांव मुमुक्ष ।।२६।।
म्हणे मी काये अनोपकारी। म्हणे मी काय दंभधारी ।
म्हणे मी काये अनाचारी। या नांव मुमुक्ष ।।२७।।
म्हणे मी पतित चांडाळ। म्हणे मी दुराचारी खळ ।
म्हणे मी पापी केवळ। या नांव मुमुक्ष ।।२८।।
म्हणे मी अभक्त दुर्जन। म्हणे मी हीनाहूनि हीन ।
म्हणे मी जन्मलो पाषाण। या नांव मुमुक्ष ।।२९।।
म्हणे मी दुराभिमानी। म्हणे मी तपीळ जनीं ।
म्हणे मी नाना वेसनी। या नांव मुमुक्ष ।।३०।।
म्हणे मी आळसी आंगचोर। म्हणे मी कपटी कातर ।
म्हणे मी मूर्ख अविचार। या नांव मुमुक्ष ।।३१।।
म्हणे मी निकामी वाचाळ। म्हणे मी पाषांडी तोंडाळ ।
म्हणे मी कुबुद्धि कुटीळ। या नांव मुमुक्ष ।।३२।।
म्हणे मी कांहींच नेणे। म्हणे मी सकळाहूनि उणें ।
आपलीं वर्णी कुलक्षणें। या नांव मुमुक्ष ।।३३।।
म्हणे मी अनाधिकारी। म्हणे मी कुश्चिळ अघोरी ।
म्हणे मी नीच नानापरी। या नांव मुमुक्ष ।।३४।।
म्हणे मी काये आपस्वार्थी। म्हणे मी काये अनर्थी ।
म्हणे मी नव्हे परमार्थी। या नांव मुमुक्ष ।।३५।।
म्हणे मी अवगुणाची रासी। म्हणे मी वेर्थ आलों जन्मासी ।
म्हणे मी भार जालों भूमीसी। या नांव मुमुक्ष ।।३६।।
आपणास निंदी सावकास। पोटीं संसाराचा त्रास ।
धरी सत्संगाचा हव्यास। या नांव मुमुक्ष ।।३७।।
नाना तीर्थे धुंडाळिलीं। शमदमादि साधनें केलीं ।
नाना ग्रन्थांतरें पाहिलीं। शोधूनियां ।।३८।।
तेणें नव्हे समाधान। वाटे अवघाच अनुमान ।

म्हणे रिघों संतांस शरण। या नांव मुमुक्ष ।।३९।।
देहाभिमान कुळाभिमान। द्रव्याभिमान नानाभिमान ।
सांडूनि, संतचरणीं अनन्य- । या नांव मुमुक्ष ।।४०।।
अहंता सांडूनि दूरी। आपणास निंदी नानापरी ।
मोक्षाची अपेक्षा करी। या नांव मुमुक्ष ।।४१।।
ज्याचें थोरपण लाजे। जो परमार्थाकारणें झिजे ।
संतापाईं विश्वास उपजे। या नांव मुमुक्ष ।।४२।।
स्वार्थ सांडून प्रपंचाचा। हव्यास धरिला परमार्थाचा ।
अंकित होईन सज्जनाचा। म्हणे तो मुमुक्ष ।।४३।।
ऐसा मुमुक्ष जाणिजे। संकेतचिन्हें वोळखिजे ।
पुढें श्रोतीं अवधान दीजे। साधकलक्षणीं ।।४४।।
इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे मुमुक्षलक्षणनाम
समास आठवा ।।८।।५. ८

---

समास नववा : साधकनिरूपण

||श्रीराम ||

मागां मुमुक्षाचें लक्षण। संकेतें केलें कथन ।
आतां परिसा सावधान। साधक तो कैसा ।।१।।
अवगुणाचा करूनि त्याग। जेणें धरिला संतसंग ।
तयासि बोलिजे मग। साधक ऐसा ।।२।।
जो संतांसि शरण गेला। संतजनीं आश्वासिला ।
मग तो साधक बोलिला। ग्रन्थांतरीं ।।३।।
उपदेशिलें आत्मज्ञान। तुटलें संसारबंधन ।
दृढतेकारणें करी साधन। या नांव साधक ।।४।।
धरी श्रवणाची आवडी। अद्वैतनिरूपणाची गोडी ।
मननें अर्थांतर काढी। या नांव साधक ।।५।।
होतां सारासार विचार। ऐके होऊनि तत्पर ।

संदेह छेदूनि, दृढोत्तर- । आत्मज्ञान पाहे ।।६।।
नाना संदेहनिवृत्ती- । व्हावया, धरी सत्संगती ।
आत्मशास्त्रगुरुप्रचीती। ऐक्यतेसी आणी ।।७।।
देहबुद्धि विवेकें वारी। आत्मबुद्धि सदृढ धरी ।
श्रवण मन केलेंचि करी। या नांव साधक ।।८।।
विसंचूनि दृश्यभान। दृढ धरी आत्मज्ञान ।
विचारें राखे समाधान। या नांव साधक ।।९।।
तोडूनि द्वैताची उपाधी। अद्वैत वस्तु साधनें साधी ।
लावी ऐक्यतेची समाधी। या नांव साधक ।।१०।।
आत्मज्ञान जीर्ण जर्जर। त्याचा करी जीर्णोद्धार ।
विवेकें पावे पैलपार। या नांव साधक ।।११।।
उत्तमें साधूचीं लक्षणें। आंगिकारी निरूपणें ।
बळेंचि स्वरूपाकार होणें। या नांव साधक ।।१२।।
असत्क्रिया ते सोडिली। आणी सत्क्रिया ते वाढविली ।
स्वरूपस्थिती बळावली। या नांव साधक ।।१३।।
अवगुण त्यागी दिवसेंदिवस। करी उत्तम गुणाचा अभ्यास ।
स्वरूपीं लावी निजध्यास। या नांव साधक ।।१४।।
दृढ निश्चयाचेनि बळें। दृश्य असतांच नाडळे ।
सदा स्वरूपीं मिसळे। या नांव साधक ।।१५।।
प्रत्यक्ष माया अलक्ष करी। अलक्ष वस्तु लक्षी अंतरीं ।
आत्मस्थितीची धारणा धरी। या नांव साधक ।।१६।।
जें या जनासि चोरलें। मनास न वचे अनुमानलें ।
तेंचि जेणें दृढ केलें। या नांव साधक ।।१७।।
जें बोलतांचि वाचा धरी। जें पाहातांचि अंध करी ।
तें साधी नाना परी। या नांव साधक ।।१८।।
जें साधूं जाता साधवेना। जें लक्षूं जातां लक्षवेना ।
तेंचि अनुभवें आणी मना। या नांव साधक ।।१९।।

जेथें मनचि मावळे। जेथे तर्कचि पांगुळे ।
तेंचि अनुभवा आणी बळें। या नांव साधक ||२०||
स्वानुभवाचेनि योगें। वस्तु साधी लागवेगें ।
तेंचि वस्तु होये आंगें। या नांव साधक ||२१||
अनुभवाचीं आंगें जाणे। योगियांचे खुणे बाणे ।
कांहींच नहोन असणें। या नांव साधक ||२२||
परती सारून उपाधी। असाध्य वस्तु साधनें साधी ।
स्वरूपीं करी दृढ बुद्धी। या नांव साधक ||२३||
देवाभक्ताचें मूळ। शोधून पाहे सकळ ।
साध्यचि होये तत्काळ। या नांव साधक ||२४||
विवेकबळें गुप्त जाला। आपेंआप मावळला ।
दिसतो, परी देखिला। नाहींच कोणीं ||२५||
मीपण मागें सांडिलें। स्वयें आपणास धुंडिलें ।
तुर्येसहि वोलांडिलें। या नांव साधक ||२६||
पुढें उन्मनीचा सेवटीं। आपली आपण अखंड भेटी ।
अखंड अनुभवीं ज्याची दृष्टी। या नांव साधक ||२७||
द्वैताचा तटका तोडिला। भासाचा भास मोडिला ।
देहीं असोनि विदेह जाला। या नांव साधक ||२८||
जयास अखंड स्वरूपस्थिती। नाहीं देहाची अहंकृती ।
सकळ संदेहनिवृत्ती। या नांव साधक ||२९||
पंचभूतांचा विस्तार। जयासि वाटे स्वप्नाकार ।
निर्गुणीं जयाचा निर्धार। या नांव साधक ||३०||
स्वप्नीं भये जें वाटलें। तें जागृतास नाहीं आलें ।
सकळ मिथ्या निर्धारिलें। या नांव साधक ||३१||
मायेचें जें प्रत्यक्षपण। जनास वाटे हें प्रमाण ।
स्वानुभवें अप्रमाण। साधकें केलें ||३२||
निद्रा सांडूनि चेइरा जाला। तो स्वप्नभयापासून सुटला ।

माया सांडून तैसा गेला। साधक स्वरूपीं ।।३३।।
ऐसि अंतरस्थिती बाणली। बाह्य निस्पृहता अवलंबिली ।
संसारौपाधी त्यागिली। या नांव साधक ।।३४।।
कामापासूनि सुटला। क्रोधापासूनि पळाला ।
मद मत्सर सांडिला। येकीकडे ।।३५।।
कुळाभिमानासि सांडिलें। लोकलाजेस लाजविलें ।
परमार्थास माजविलें। विरक्तिबळें ।।३६।।
अविद्येपासूनि फडकला। प्रपञ्चापासूनि निष्टला ।
लोभाचे ह्यातींचा गेला। अकस्मात ।।३७।।
थोरपणासि पाडिलें। वैभवासि लाथाडिलें ।
महत्वासि झिंजाडिलें। विरक्तिबळें ।।३८।।
भेदाचा मडगा मोडिला। अहंकार झोडूनि पाडिला ।
पाईं धरूनि आपटिला। संदेहशत्रू ।।३९।।
विकल्पाचा केला वधू। थापें मारिला भवसिंधू ।
सकळ भूतांचा विरोधू। तोडूनि टाकिला ।।४०।।
भवभयासि भडकाविलें। काळाचें टांगें मोडिलें ।
मस्तक हाणोनि फोडिलें। जन्ममृत्याचें ।।४१।।
देह समंधावरी लोटला। संकल्पावरी उठावला ।
कल्पनेचा घात केला। अकस्मात ।।४२।।
अपधाकासि ताडिलें। लिंगदेहासि विभांडिलें ।
पाषांडासि पछाडिलें। विवेकबळें ।।४३।।
गर्वावरी गर्व केला। स्वार्थ अनर्थीं घातला ।
अनर्थ तोही निर्दाळिला। नीतिन्यायें ।।४४।।
मोहासि मध्येंचि तोडिलें। दुःखासि दुःधडचि केलें ।
शोकासि खंडून सांडिलें। एकीकडे ।।४५।।
द्वेष केला देशधडी। अभावाची घेतली नरडी ।
धाकें उदर तडाडी। कुतर्काचे ।।४६।।

ज्ञानें विवेक माजला। तेणें निश्चयो बळावला ।
अवगुणांचा संव्हार केला। वैराग्यबळें ।।४७।।
अधर्मास स्वधर्में लुटिलें। कुकर्मासि सत्कर्में झुगटिलें ।
लांटुन वाटा लाविलें। विचारें अविचारासी ।।४८।।
तिरस्कार तो चिरडिला। द्वेष खिरडूनि सांडिला ।
विषाद अविषादें घातला। पायांतळीं ।।४९।।
कोपावरी घालणें घातलें। कापट्य अन्तरीं कुटिलें ।
सख्य आपुलें मानिलें। विश्वजनीं ।।५०।।
प्रवृत्तीचा केला त्याग। सुहृदांचा सोडिला संग ।
निवृत्तिपंथें ज्ञानयोग। साधिता जाहला ।।५१।।
विषयमैंदासि सिंतरिलें। कुविद्येसी वेढा लाविलें ।
आपणास सोडविलें। आप्ततस्करांपासूनी ।।५२।।
पराधीनतेवरी कोपला। ममतेवरी संतापला ।
दुराशेचा त्याग केला। येकायेकीं ।।५३।।
स्वरूपीं घातलें मना। यातनेसि केली यातना ।
साक्षेप आणि प्रेत्ना। प्रतिष्ठिलें ।।५४।।
अभ्यासाचा संग धरिला। साक्षपासरिसा निघाला ।
प्रेत्न सांगातीं घेतला। साधनपंथें ।।५५।।
सावध दक्ष तो साधक। पाहे नित्यानित्यविवेक ।
संग त्यागूनि एक। सत्संग धरी ।।५६।।
बळेंचि सारिला संसार। विवेकें टाकिला जोजार ।
शुद्धाचारें अनाचार। भ्रष्टविला ।।५७।।
विसरास विसरला। आळसाचा आळस केला ।
सावध नाहीं दुश्चित झाला। दुश्चितपणासी ।।५८।।
आतां असो हें बोलणें। अवगुण सांडी निरूपणें ।
तो साधक ऐसा येणें- । प्रमाणें बुझावा ।।५९।।
बळेंचि अवघा त्याग कीजे। म्हणोनि साधक बोलिजे ।

आतां सिद्ध तोचि जाणिजे। पुढिले समासीं ||६०||
येथें संशयो उठिला। निस्पृह तोचि साधक जाहला ।
त्याग न घडे संसारिकाला। तरि तो साधक नव्हे कीं ||६१||
ऐसें श्रोतयाचें उत्तर। त्याचें कैसें प्रत्युत्तर ।
पुढिले समासीं तत्पर। होऊनि ऐका ||६२||
इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे
साधकलक्षणनिरूपण नाम समास नववा ||९||५. ९

---

समास दहावा : सिद्धलक्षण निरूपण

||श्रीराम ||

मागां बोलिला संसारिक। त्यागेंविण नव्हे कीं साधक ।
ऐका याचा विवेक। ऐसा असे ||१||
सन्मार्ग तोचि जीवीं धरणें। अन्मार्गाचा त्याग करणें ।
संसारिका त्याग येणें। प्रकारें ऐसा ||२||
कुबुद्धित्यागेंविण कांहीं। सुबुद्धि लागणार नाहीं ।
संसारिकां त्याग पाहीं। ऐसा असे ||३||
प्रपंचीं वीट मानिला। मनें विषयेत्याग केला ।
तरीच पुढें अवलंबिला। परमार्थमार्ग ||४||
त्याग घडे अभावाचा। त्याग घडे संशयाचा ।
त्याग घडे अज्ञानाचा। शनै शनै ||५||
ऐसा सूक्ष्म अंतर्त्याग। उभयतांस घडे सांग ।
निस्पृहास बाह्य त्याग। विशेष आहे ||६||
संसारिका ठाईं ठाईं। बाह्य त्याग घडे कांहीं ।
नित्य नेम श्रवण नाहीं। त्यागेंविण ||७||
फिटली आशंका स्वभावें। त्यागेंविण साधक नव्हे ।
पुढें कथेचा अन्वय। सावध ऐका ||८||
मागां झालें निरूपण। साधकाची ओळखण ।

आतां सांगिजेल खूण। सिद्धलक्षणाची ।।९।।
साधु वस्तु होऊनि ठेला। संशयें ब्रह्मांडाबाहेरी गेला ।
निश्चयें चळेना ऐसा झाला। या नांव सिद्ध ।।१०।।
बद्धपणाचे अवगुण। मुमुक्षुपणीं नाहीं जाण ।
मुमुक्षुपणाचें लक्षण। साधकपणीं नाहीं ।।११।।
साधकासि संदेहवृत्ति। पुढें होतसे निवृत्ती ।
या कारणें निःसंदेह श्रोतीं। साधु वोळखावा ।।१२।।
संशयरहित ज्ञान। तेंचि साधूचें लक्षण ।
सिद्धाआंगीं संशयो हीन। लागेल कैसा ।।१३।।
कर्ममार्ग संशयें भरला। साधनीं संशय कालवला ।
सर्वांमध्यें संशयो भरला। साधु तो निःसंदेह ।।१४।।
संशयाचें ज्ञान खोटें। संशयाचें वैराग्य पोरटें ।
संशयाचें भजन वोखटें। निर्फळ होय ।।१५।।
व्यर्थ संशयाचा देव। व्यर्थ संशयाचा भाव ।
व्यर्थ संशयाचा स्वभाव। सर्व कांही ।।१६।।
व्यर्थ संशयाचें व्रत। व्यर्थ संशयाचें तीर्थ ।
व्यर्थ संशयाचा परमार्थ। निश्चयेंवीण ।।१७।।
व्यर्थ संशयाची भक्ती। व्यर्थ संशयाची प्रीती ।
व्यर्थ संशयाची संगती। संशयो वाढवी ।।१८।।
व्यर्थ संशयाचें जिणें। व्यर्थ संशयाचें धरणें ।
व्यर्थ संशयाचें करणें। सर्व कांहीं ।।१९।।
व्यर्थ संशयाची पोथी। व्यर्थ संशयाची व्युत्पत्ती ।
व्यर्थ संशयाची गती। निश्चयेंविण ।।२०।।
व्यर्थ संशयाचा दक्ष। व्यर्थ संशयाचा पक्ष ।
व्यर्थ संशयाचा मोक्ष। होणार नाहीं ।।२१।।
व्यर्थ संशयाचा संत। व्यर्थ संशयाचा पंडित ।
व्यर्थ संशयाचा बहुश्रुत। निश्चयेंविण ।।२२।।

व्यर्थ संशयाची श्रेष्ठता। व्यर्थ संशयाची व्युत्पन्नता ।
व्यर्थ संशयाचा ज्ञाता। निश्चयेंविण ।।२३।।
निश्चयेंविण सर्व कांहीं। अणुमात्र तें प्रमाण नाहीं ।
व्यर्थचि पडिले प्रवाहीं। संदेहाचे ।।२४।।
निश्चयेंविण जें बोलणें। तें अवघेंचि कंटाळवाणें ।
बाष्कळ बोलिजे वाचाळपणें। निरर्थक ।।२५।।
असो निश्चयेंविण जे वल्गना। ते अवघीच विटंबना ।
संशयें काहीं समाधाना। उरी नाहीं ।।२६।।
म्हणोनि संदेहरहित ज्ञान। निश्चयाचें समाधान ।
तेंचि सिद्धाचें लक्षण। निश्चयेंसीं ।।२७।।
तंव श्रोता करी प्रश्न। निश्चय करावा कवण ।
मुख्य निश्चयाचें लक्षण। मज निरूपावें ।।२८।।
ऐक निश्चय तो ऐसा। मुख्य देव आहे कैसा ।
नाना देवांचा वळसा। करूंचि नये ।।२९।।
जेणें निर्मिलें सचराचर। त्याचा करावा विचार ।
शुद्ध विवेकें परमेश्वर। ओळखावा ।।३०।।
मुख्य देव तो कोण। भक्तांचें कैसें लक्षण ।
असत्य सांडून वोळखण। सत्याची धरावी ।।३१।।
आपुल्या देवास वोळखावें। मग मी कोण हें पहावें ।
संग त्यागून रहावें। वस्तुरूप ।।३२।।
तोडावा बंधनाचा संशयो। करावा मोक्षाचा निश्चयो ।
पहावा भूतांचा अन्वयो। वितिरेकेंसीं ।।३३।।
पूर्वपक्षें सिद्धांत। पहावा प्रकृतीचा अंत ।
मग पावावा निवांत। निश्चयो देवाचा ।।३४।।
देहाचेनि योगें संशयो। करी समाधानाचा क्षयो ।
चळों नेदावा निश्चयो। आत्मत्वाचा ।।३५।।
सिद्ध असतां आत्मज्ञान। संदेह वाढवी देहाभिमान ।

याकारणें समाधान। आत्मनिश्चयें राखावें ||३६||
आठवतां देहबुद्धी। उडे विवेकाची शुद्धी।
याकारणें आत्मबुद्धी। सद्दढ करावी ||३७||
आत्मबुद्धी निश्चयाची। तेचि दशा मोक्षश्रीची।
अहमात्मा हें कधींची। विसरों नये ||३८||
निरोपिलें निश्चयाचें लक्षण। परी हें न कळे सत्संगेंविण।
संतांसी गेलिया शरण। संशये तुटती ||३९||
आतां असो हें बोलणें। ऐका सिद्धाचीं लक्षणें।
मुख्य निःसंदेहपणें। सिद्ध बोलिजे ||४०||
सिद्धस्वरूपीं नाहीं देहो। तेथें कैंचा हो संदेहो।
याकारणें सिद्ध पाहो। निःसंदेही ||४१||
देहसमंधाचेनि गुणें। लक्षणासि काये उणें।
देहातीतांचीं लक्षणें। काय म्हणोनि सांगावीं ||४२||
जें लक्षवेना चक्षूंसी। त्याचीं लक्षणें सांगावीं कैसीं।
निर्मळ वस्तु सिद्ध त्यासी। लक्षणें कैंसीं ||४३||
लक्षणें म्हणिजे केवळ गुण। वस्तु ठाईंची निर्गुण।
तेंचि सिद्धांचें लक्षण। वस्तुरूप ||४४||
तथापि ज्ञानदशकीं बोलिलें। म्हणोनि वक्तृत्व आटोपिलें।
न्यून पूर्ण क्षमा केलें। पाहिजे श्रोतीं ||४५||
इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे
सिद्धलक्षणनिरूपणनाम समास दहावा ||१०||५. १०
||दशक पाचवा समाप्त ||

---

Proofread by Vishwas Bhide and Sunder Hattangadi.

---

```
%@@1
% File name             : dAsabodh05.itx
%---------------------------------------------
% Text title            : Dasabodh dAsabodha
% Author                : Swami Samartha Ramadas
% Language              : Marathi, Sanskrit
% Subject               :
philosophy/hinduism/religion
% Description/comments  :
% Transliterated by     : Vishwas Bhide
vishwas_bhide@yahoo.com, santsahitya@yahoo.co.in
Sunder Hattangadi sunderh@hotmail.com, NA
% Proofread by          : Vishwas Bhide
vishwas_bhide@yahoo.com, santsahitya@yahoo.co.in,
Sunder Hattangadi sunderh@hotmail.com, NA
% Latest update         : May 16, 2009
% Send corrections to   : sanskrit@cheerful.com
%
% Special Instructions:
%
i1h.hdr,ijag.inc,itrans.sty,multicol.sty,iarticle.s
ty
% Transliteration scheme: ITRANS 5.2
% Site access  :
% http://sanskritdocuments.org/
% http://sanskrit.gde.to/
%---------------------------------------------------
---
% The text is to be used for personal studies and
research only.
% Any use for commercial purpose is prohibited as a
'gentleman's'
% agreement.
% @@2
%
% Commands upto engtitle are
% needed for devanaagarii output and formatting.
%---------------------------------------------------
------
```

## ||समर्थ रामदासांचा दासबोध दशक ६ ||

||दशक सहावा : देवशोधन ||६||

समास पहिला : देवशोधन

||श्रीराम ||

चित्त सुचित करावें। बोलिलें तें जीवीं धरावें ।
सावध होऊन बैसावें। निमिष एक ||१||
कोणी एके ग्रामीं अथवा देशीं। राहणें आहे आपणासी ।
न भेटतां तेथिल्या प्रभूसी। सौख्य कैंचें ||२||
म्हणौनि ज्यास जेथें राहणें। तेणें त्या प्रभूची भेटी घेणें ।
म्हणिजे होय श्लाघ्यवाणें। सर्व कांहीं ||३||
प्रभूची भेटी न घेतां। तेथें कैंची मान्यता ।
आपुलें महत्व जातां। वेळ नाहीं ||४||
म्हणौनि रायापासूनि रंक। कोणी एक तरी नायक ।
त्यास भेटणें हा विवेक। विवेकी जाणती ||५||
त्यास न भेटतां त्याचे नगरीं। राहतां धरितील बेगारी ।
तेथें न करितां चोरी। अंगीं लागे ||६||
याकारणें जो शहाणा। तेणें प्रभूसी भेटावें जाणा ।
ऐसें न करितां दैन्यवाणा। संसार त्याचा ||७||
ग्रामीं थोर ग्रामाधिपती। त्याहूनि थोर देशाधिपती ।
देशाधिपतीहूनि नृपती। थोर जाणावा ||८||

राष्ट्राचा प्रभु तो राजा। बहुराष्ट्र तो महाराजा ।
महाराजांचाही राजा। तो चक्रवर्ती ।।९।।
एक नरपती एक गजपती। एक हयपती एक भूपती ।
सकळांमध्ये चक्रवर्ती। थोर राजा ।।१०।।
असो ऐशिया समस्तां। एक ब्रह्मा निर्माणकर्ता ।
त्या ब्रह्म्यासही निर्मिता। कोण आहे ।।११।।
ब्रह्मा विष्णु आणि हर। त्यांसी निर्मिता तोचि थोर ।
तो ओळखावा परमेश्वर। नाना यत्नें ।।१२।।
तो देव ठायीं पडेना। तरी यमयातना चुकेना ।
ब्रह्माण्डनायका चोजवेना। हें बरें नव्हे ।।१३।।
जेणें संसारीं घातलें। अवघें ब्रह्माण्ड निर्माण केलें ।
त्यासी नाहीं ओळखिलें। तोचि पतित ।।१४।।
म्हणोनि देव ओळखावा। जन्म सार्थकचि करावा ।
न कळे तरी सत्संग धरावा। म्हणजे कळे ।।१५।।
जो जाणेल भगवंत। तया नांव बोलिजे संत ।
जो शाश्वत आणि अशाश्वत। निवाडा करी ।।१६।।
चळेना ढळेना देव। ऐसा ज्याचा अंतर्भाव ।
तोचि जाणिजे महानुभाव। तोचि साधू ।।१७।।
जो जनांमध्ये वागे। परी जनांवेगळी गोष्टी सांगे ।
ज्याचे अंतरीं ज्ञान जागे। तोचि साधू ।।१८।।
जाणिजे परमात्मा निर्गुण। त्यासींच म्हणावें ज्ञान ।
त्यावेगळें तें अज्ञान। सर्व कांहीं ।।१९।।
पोट भरावयाकारणें। नाना विद्या अभ्यास करणें ।
त्यास ज्ञान म्हणती परी तेणें। सार्थक नव्हे ।।२०।।
देव ओळखावा एक। तेंचि ज्ञान तें सार्थक ।
येर अवघेंचि निरर्थक। पोटविद्या ।।२१।।
जन्मवरी पोट भरिलें। देहाचें संरक्षण केलें ।

पुढें अवघेंचि व्यर्थ गेलें। अंतकाळीं ।।२२।।
एवं पोट भरावयाची विद्या। तियेसी म्हणों नये सद्विद्या ।
सर्वव्यापक वस्तु सद्या। पाविजे तें ज्ञान ।।२३।।
ऐसें जयापाशीं ज्ञान। तोचि जाणावा सज्जन ।
तयापासीं समाधान। पुशिलें पाहिजे ।।२४।।
अज्ञानास भेटतां अज्ञान। तेथें कैंचें सांपडेल ज्ञान ।
करंट्यास करंट्याचें दर्शन। होतां भाग्य कैंचें ।।२५।।
रोग्यापाशीं रोगी गेला। तेथें कैंचें आरोग्य त्याला ।
निर्बळापाशीं निर्बळाला। पाठी कैंची ।।२६।।
पिशाच्यापाशीं पिशाच गेलें। तेथें कोण सार्थक झालें ।
उन्मत्तास उन्मत्त भेटलें। त्यास उमजवी कवणू ।।२७।।
भिकाऱ्यापाशीं मागतां भिक्षा। दीक्षाहीनापाशीं
मागतां दीक्षा ।
उजेड पाहतां कृष्णपक्षा। पाविजे कैंचा ।।२८।।
अबद्धापाशीं गेला अबद्ध। तो कैसेनि होईल सुबद्ध ।
बद्धास भेटतां बद्ध। सिद्ध नव्हे ।।२९।।
देह्यापाशीं गेला देही। तो कैसेनि होईल विदेही ।
म्हणोनि ज्ञात्यावांचूनि नाहीं। ज्ञानमार्ग ।।३०।।
याकारणें ज्ञाता पहावा। त्याचा अनुग्रह घ्यावा ।
सारासारविचारें जीवा। मोक्ष प्राप्त ।।३१।।
हरि ॐ तत्सत्। इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे
षष्ठदशके देवशोधननिरूपणं नाम प्रथमः समासः ।।१।।६. १
जय जय रघुवीर समर्थ ।।

---

समास दुसरा : ब्रह्मपावननिरूपण
श्रीराम ।।
ऐका उपदेशाचीं लक्षणें। सायुज्यप्राप्ति होय जेणें ।

नाना मतांचें पेखणें। कामा नये सर्वथा ।।१।।
ब्रह्मज्ञानावीण उपदेश। तो म्हणों नये विशेष ।
धान्येविण जैसें भूस। खातां नये ।।२।।
नाना काबाड बडविलें। नातरी तक्रचि घुसळिलें ।
अथवा धुवणचि सेविलें। सावकाश ।।३।।
नाना साली भक्षिल्या। अथवा चोइट्या चोखिल्या ।
खोबरें सांडून खादल्या। नरोट्या जैशा ।।४।।
तैसें ब्रह्मज्ञानाविण। नाना उपदेशांचा शीण ।
सार सांडून असार कोण। शहाणा सेवी ।।५।।
आतां ब्रह्म जें कां निर्गुण। तेंचि केलें निरूपण ।
सुचित करावें अंतःकरण। श्रोतेजनीं ।।६।।
सकळ सृष्टीची रचना। तें हें पंचभौतिक जाणा ।
परंतु हें तगेना। सर्वकाळ ।।७।।
आदि अंतीं ब्रह्म निर्गुण। तेचि शाश्वताची खूण ।
येर पंचभौतिक सगुण। नाशवंत ।।८।।
येरवीं हीं पाहतां भूतें। देव कैसें म्हणावें त्यांतें ।
भूत म्हणतां मनुष्यांतें। विषाद वाटे ।।९।।
मा तो जगन्नाथ परमात्मा। त्यासि आणि भूतउपमा ।
ज्याचा कळेना महिमा। ब्रह्मादिकांसी ।।१०।।
भूतां ऐसा जगदीश। म्हणतां उत्पन्न होतो दोष ।
याकारणें महापुरुष। सर्व जाणती ।।११।।
पृथ्वी आप तेज वायु आकाश। यां सबाह्य जगदीश ।
पंचभूतांस आहे नाश। आत्मा अविनाशरूपी ।।१२।।
जें जें रूप आणि नाम। तो तो अवघाच भ्रम ।
नामरूपातीत वर्म। अनुभवें जाणावें ।।१३।।
पंचभूतें आणि त्रिगुण। ऐशी अष्टधा प्रकृति जाण ।
अष्टधा प्रकृतीस नामाभिधान। दृश्य ऐसें ।।१४।।

तें हें दृश्य नाशिवंत। ऐसें वेद श्रुति बोलत ।
निर्गुण ब्रह्म शाश्वत। जाणती ज्ञानी ।।१५।।
जें शस्त्रें तोडितां तुटेना। जें पावकें जाळितां जळेना ।
जें कालवितां कालवेना। आपेंकरूनी ।।१६।।
जें वायूचेनि उडेना। जें पडेना ना झडेना ।
जें घडेना ना दडेना। परब्रह्म तें ।।१७।।
ज्यासि वर्णचि नसे। जें सर्वांहूनि अनारिसें ।
परंतु असतचि असे। सर्वकाळ ।।१८।।
दिसेना तरी काय झालें। परंतु सर्वत्र संचलें ।
सूक्ष्मचि कोंदाटलें। जेथें तेथें ।।१९।।
दृष्टीस लागली सवे। जें दिसेल तेंचि पहावें ।
परंतु गुज तें जाणावें। गौप्य आहे ।।२०।।
प्रगट तें जाणावें असार। आणि गुप्त तें जाणावें सार ।
सद्गुरुमुखें हा विचार। उमजों लागे ।।२१।।
उमजेना तें उमजावें। दिसेना तें पहावें ।
जें कळेना तें जाणावें। विवेकबळें ।।२२।।
गुप्त तेंचि प्रगटवावें। असाध्य तेंचि साधावें ।
कानडेंचि अभ्यासावें। सावकाश ।।२३।।
वेद विरंचि आणि शेष। जेथें शिणले निःशेष ।
तेंचि साधावें विशेष। परब्रह्म तें ।।२४।।
तरी तें कवणें परी साधावें। तेंचि बोलिलें स्वभावें ।
अध्यात्मश्रवणें पावावें। परब्रह्म तें ।।२५।।
पृथ्वी नव्हे आप नव्हे। तेज नव्हे वायु नव्हे ।
वर्णव्यक्ति ऐसें नव्हे। अव्यक्त तें ।।२६।।
तयास म्हणावें देव। वरकड लोकांचा स्वभाव ।
जितुके गांव तितुके देव। जनांकारणें ।।२७।।
ऐसा देवाचा निश्चयो झाला। देव निर्गुण प्रत्यया आला ।

आतां आपणचि आपला। शोध घ्यावा ।।२८।।
माझें शरीर ऐसें म्हणतो। तरी तो जाण देहावेगळाचि तो ।
मन माझें ऐसें जाणतो। तरी तो मनही नव्हे ।।२९।।
पाहतां देहाचा विचार। अवघा तत्त्वांचा विस्तार ।
तत्त्वें तत्त्व झाडितां सार। आत्माचि उरे ।।३०।।
आपणासि ठावचि नाहीं। तेथें पाहणें नलगे कांहीं ।
तत्त्वें ठायींच्या ठायीं। विभागूनि गेलीं ।।३१।।
बांधली आहे तों गांठोडी। जो कोणी विचारें सोडी ।
विचार पाहतां गांठोडी। आढळेना ।।३२।।
तत्त्वांचें गांठोडें शरीर। याचा पाहतां विचार ।
एक आत्मा निरंतर। आपण नाहीं ।।३३।।
आपणासि ठावचि नाहीं। जन्म मृत्यु कैंचे काई ।
पाहतां वस्तूच्या ठायीं। पाप पुण्य नसे ।।३४।।
पाप पुण्य यमयातना। हें निर्गुणीं तों असेना ।
आपण तोचि तरी जन्ममरणा। ठावो कैंचा ।।३५।।
देहबुद्धीनें बांधला। तो विवेकें मोकळा केला ।
देहातीत होतां पावला। मोक्षपद ।।३६।।
झालें जन्माचें सार्थक। निर्गुण आत्मा आपण एक ।
परंतु हा विवेक। पाहिलाचि पहावा ।।३७।।
जागें होतां स्वप्न सरे। विवेक पाहतां दृश्य ओसरे ।
स्वरूपानुसंधानें तरे। प्राणिमात्र ।।३८।।
आपणास निवेदावें। आपण विवेकें नुरावें ।
आत्मनिवेदन जाणावें। याचें नांव ।।३९।।
आधीं अध्यात्मश्रवण। मग सद्गुरुपादसेवन ।
पुढें आत्मनिवेदन। सद्गुरुप्रसादें ।।४०।।
आत्मनिवेदनाउपरी। निखळ वस्तु निरंतरी ।
आपण आत्मा हा अंतरीं। बोध जाहला ।।४१।।

त्या ब्रह्मबोधें ब्रह्मचि झाला। संसारखेद तो उडाला ।
देह प्रारब्धीं टाकिला। सावकाश ।।४२।।
यासि म्हणिजे आत्मज्ञान। येणें पाविजे समाधान ।
परब्रह्मीं अभिन्न। भक्तचि जाहला ।।४३।।
आतां होणार तें होईना कां। आणि जाणार तें जाईना कां ।
तुटली मनांतील आशंका। जन्ममृत्यूची ।।४४।।
संसारीं पुंडावें चुकलें। देवां भक्तां ऐक्य झालें ।
मुख्य देवासि ओळखिलें। सत्संगेंकरूनी ।।४५।।
हरिः ॐ तत्सत् इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे षष्ठदशके
ब्रह्मप्रतिपादननिरूपणं नाम द्वितीयः समासः ।।२।।६. २

---

समास तिसरा : मायोद्भवनिरूपण
श्रीराम ।।
निर्गुण आत्मा तो निश्चळ। जैसें आकाश अंतराळ ।
घन दाट निर्मळ निश्चळ। सदोदित ।।१।।
जें खंडलेंचि नाहीं अखंड। जें उदंडाहूनि उदंड ।
जें गगनाहूनि वाड। अति सूक्ष्म ।।२।।
जें दिसेना ना भासेना। जें उपजेना ना नासेना ।
जें येईना ना जाईना। परब्रह्म तें ।।३।।
जें चळेना ना ढळेना। जें तुटेना ना फुटेना ।
जें रचेना ना खचेना। परब्रह्म तें ।।४।।
जें सन्मुखचि सर्वकाळ। जें निष्कलंक आणि निखळ ।
सर्वांतर आकाश पाताळ। व्यापूनि असे ।।५।।
अविनाश तें ब्रह्म निर्गुण। नासे तें माया सगुण ।
सगुण आणि निर्गुण। कालवलें ।।६।।
या कर्दमाचा विचार। करूं जाणती योगीश्वर ।
जैसें क्षीर आणि नीर। राजहंस निवडिती ।।७।।

जड सकळ पंचभौतिक। त्यामध्यें आत्मा व्यापक ।
तो नित्यानित्यविवेक। पाहतां कळे ।।८।।
ऊंसामधील घेईजे रस। येर तें सांडिजे बाकस ।
तैसा जगामध्यें जगदीश। विवेकें ओळखावा ।।९।।
रस नाशवंत पातळ। आत्मा शाश्वत निश्चळ ।
रस अपूर्ण आत्मा केवळ। परिपूर्ण जाणावा ।।१०।।
आत्म्यासारिखें एक असावें। मग तें दृष्टांतासि द्यावें ।
दृष्टांतमिसे समजावें। कैसें तरी ।।११।।
ऐशी आत्मस्थिति संचली। तेथें माया कैशी झाली ।
जैशी आकाशीं वाहिली। झुळूक वायूची ।।१२।।
वायूपासून तेज झालें। तेजापासून आप निपजलें ।
आपापासून आकारलें। भूमंडळ ।।१३।।
भूमंडळापासून उत्पत्ती। जीव नेणों झाले किती ।
परंतु ब्रह्म आदि अंतीं। व्यापून आहे ।।१४।।
जें जें कांहीं निर्माण झालें। तें तें अवघेंचि नासलें ।
परी मुळीं ब्रह्म तें संचलें। जैसें तैसें ।।१५।।
घटापूर्वी आकाश असे। घटामध्येंही आकाश भासे ।
घट फुटतां न नासे। आकाश जैसें ।।१६।।
तैसें परब्रह्म केवळ। अचळ आणि अढळ ।
मध्यें होत जात सकळ। सचराचर ।।१७।।
जें जें कांहीं निर्माण झालें। तें तें आधीं ब्रह्में
व्यापिलें ।
सर्व नासतां उरलें। अविनाश ब्रह्म ।।१८।।
ऐसें ब्रह्म अविनाश। तें सेविती ज्ञाते पुरुष ।
तत्त्वनिरसनें आपणास। आपण लाभे ।।१९।।
तत्त्वें तत्त्व मेळविलें। त्यासि देह ऐसें नाम ठेविलें ।
तें जाणते पुरुषीं शोधिलें। तत्त्वें तत्त्व ।।२०।।

तत्त्वझाडा निःशेष होतां। तेथें निमाली देहअहंता ।
निर्गुण ब्रह्मीं ऐक्यता। विवेकें जाहली ।।२१।।
विवेकें देहाकडे पाहिलें। तों तत्त्वें तत्त्व ओसरलें ।
आपण कांहीं नाहीं आलें। प्रत्ययासी ।।२२।।
आपला आपण शोध घेतां। आपुली तों मायिक वार्ता ।
तत्त्वांतीं उरलें तत्त्वता। निर्गुण ब्रह्म ।।२३।।
आपणाविण निर्गुण ब्रह्म। हेंचि निवेदनाचें वर्म ।
तत्त्वासरिसा गेला भ्रम। मीतूंपणाचा ।।२४।।
मीपण पाहतां आढळेना। निर्गुण ब्रह्म तें चळेना ।
आपण तेंचि परी कळेना। सद्गुरूविण ।।२५।।
सारासार अवघें शोधिलें। तों असार तें निघून गेलें ।
पुढें सार तें उरलें। निर्गुण ब्रह्म ।।२६।।
आधीं ब्रह्म निरूपिलें। तेंचि सकळामध्यें व्यापिलें ।
सकळ अवघेंचि नासलें। उरलें तें केवळ ब्रह्म ।।२७।।
होतां विवेकें संहार। तेथें निवडे सारासार ।
आपला आपणासि विचार। ठायीं पडे ।।२८।।
आपण कल्पिलें मीपण। मीपण शोधितां नुरे जाण ।
मीपण गेलिया निर्गुण। आत्माचि स्वयें ।।२९।।
झालिया तत्त्वांचें निरसन। निर्गुण आत्माचि आपण ।
कां दाखवावें मीपण। तत्त्वनिरसनाउपरी ।।३०।।
तत्त्वांमध्यें मीपण गेलें। तरी निर्गुण सहजचि उरलें ।
सोहंभावें प्रत्यया आलें। आत्मनिवेदन ।।३१।।
आत्मनिवेदन होतां। देवभक्तांस ऐक्यता ।
साचार भक्त विभक्तता। सांडूनि जाहला ।।३२।।
निर्गुणासि नाहीं जन्ममरण। निर्गुणासि नाहीं पाप पुण्य ।
निर्गुणीं अनन्य होतां आपण। मुक्त जाहला ।।३३।।
तत्त्वीं वेंटाळूनि घेतला। प्राणी संशयें गुंडाळला ।

आपणास आपण भुलला। कोहं म्हणे ||३४||
तत्त्वीं गुंतला म्हणे कोहं। विवेकें पाहतां म्हणे सोहं |
अनन्य होतां अहं सोहं। मावळलीं ||३५||
याउपरि उर्वरित। तेंचि स्वरूप संत |
देहीं असोनि देहातीत। जाणिजे ऐसा ||३६||
संदेहवृत्ति ते न भंगे। म्हणोनि बोलिलेंच बोलावें लागे ||
आम्हांसि हें घडलें प्रसंगें। श्रोतीं क्षमा केली
पाहिजे ||३७||
हरिॐतत्सत् इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे षष्ठदशके
मायोद्भवनिरूपणं नाम तृतीयः समासः ||३||६. ३

---

जय जय रघुवीर समर्थ ||
समास चवथा : ब्रह्मनिरूपण
श्रीराम ||
कृतयुग सत्रा लक्ष अठ्ठावीस सहस्र। त्रेतायुग बारा
लक्ष शाण्णव सहस्र |
द्वापरयुग आठ लक्ष चौसष्ट सहस्र। आतां कलियुग ऐका ||१||
कलियुग चार लक्ष बत्तीस सहस्र। चतुर्युगें त्रेचाळीस
लक्ष वीस सहस्र |
ऐशीं चतुर्युगें सहस्र। तो ब्रह्मयाचा एक दिवस ||२||
ऐसे ब्रह्मे सहस्र देखा। तेव्हां विष्णूची एक घटिका |
विष्णू सहस्र होतां ऐका। पळ एक ईश्वराचें ||३||
ईश्वर जाय सहस्र वेळ। तैं शक्तीचें अर्ध पळ |
ऐशी संख्या बोलिली सकळ। शास्त्रांतरीं ||४||
चतुर्युगसहस्राणि दिनमेकंपितामहम् |
पितामहसहस्राणि विष्णोर्घटिकमेव च ||
विष्णोरेकः सहस्राणि पलमेकं महेश्वरम् |

महेश्वरसहस्राणि शक्तेरर्धं पलं भवेत् ।।
ऐशा अनन्त शक्ती होती। अनंत रचना होती जाती ।
तरी अखंड खंडेना स्थिति। परब्रह्माची ।।५।।
परब्रह्मासि कैंची स्थिती। परी ही बोलावयाची रीती ।
वेदश्रुती नेति नेति म्हणती। परब्रह्मीं ।।६।।
चार सहस्र सातशें साठी। इतुकी कलियुगाची राहाटी ।
उरल्या कलियुगाची गोष्टी। ऐसी असे ।।७।।
चार लक्ष सत्तावीस सहस्र। दोनशें चाळीस संवत्सर ।
पुढें अन्योन्य वर्णसंकर। होणार आहे ।।८।।
ऐसें रचलें चराचर। येथें एकाहूनि एक थोर ।
पाहतां येथींचा विचार। अंत न लगे ।।९।।
एक म्हणती विष्णु थोर। एक म्हणती रुद्र थोर ।
एक म्हणती शक्ति थोर। सकळांमध्यें ।।१०।।
ऐसे आपुलालेपरी बोलती। परंतु अवघेंचि नासेल कल्पांतीं ।
यद्दृष्टं तन्नष्टं हें श्रुति। बोलतसे ।।११।।
आपुलाली उपासना। अभिमान लागला जनां ।
याचा निश्चयो निवडेना। साधुविण ।।१२।।
साधु निश्चयो करिती एक। आत्मा सर्वत्र व्यापक ।
येर हें अवघेंचि मायिक। चराचर ।।१३।।
चित्रीं लिहिली सेना। त्यांत कोण थोर कोण साना ।
हें कां तुम्ही विचाराना। आपुलें ठायीं ।।१४।।
स्वप्नीं उदंड देखिलें। लहान थोरही कल्पिलें ।
परंतु जागें झालिया झालें। कैसें पहा ।।१५।।
पाहतां जागृतीचा विचार। कैंचें लहान कैंचें थोर ।
झाला अवघाचि विचार। स्वप्नरचनेचा ।।१६।।
अवघाचि मायिक विचार। कैंचें लहान कैंचें थोर ।
लहानथोराचा हा निर्धार। जाणती ज्ञानी ।।१७।।

जो जन्मास प्राणी आला। तो मी थोर म्हणतचि मेला ।
परी याचा विचार पाहिला। पाहिजे श्रेष्ठीं ।।१८।।
जयां झालें आत्मज्ञान। तेचि थोर महाजन ।
वेद शास्त्रें पुराण। साधु संत बोलिले ।।१९।।
एवं सकळांमध्यें थोर। तो एकचि परमेश्वर ।
तयामध्यें हरिहर। होती जाती ।।२०।।
तो निर्गुण निराकार। तेथें नाहीं उत्पत्ति स्थिति संहार ।
स्थानमानांचा विचार। ऐलिकडे ।।२१।।
नांव रूप स्थान मान। हा तों अवघाचि अनुमान ।
तथापि होईल निदान। ब्रह्मप्रळयीं ।।२२।।
ब्रह्म प्रळयावेगळें। ब्रह्म नामरूपावेगळें ।
ब्रह्म कोणा एक्या काळें। जैसें तैसें ।।२३।।
करिती ब्रह्मनिरूपण। जाणती ब्रह्म संपूर्ण ।
तेचि जाणावे ब्राह्मण। ब्रह्मविद ।।२४।।
हरिः ॐ तत्सत् इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे
षष्ठदशके ब्रह्मनिरूपणं नाम चतुर्थः समासः ।।४।।६. ४

---

समास पांचवा : मायाब्रह्मनिरूपण
श्रीराम ।।
श्रोते पुसती ऐसें। मायाब्रह्म तें कैसें ।
श्रोत्या वक्त्याचे मिषें। निरूपण ऐका ।।१।।
ब्रह्म निर्गुण निराकार। माया सगुण साकार ।
ब्रह्मासि नाहीं पारावार। मायेसि आहे ।।२।।
ब्रह्म निर्मळ निश्चळ। माया चंचळ चपळ ।
ब्रह्म निरुपाधि केवळ। माया उपाधिरूप ।।३।।
माया दिसे ब्रह्म दिसेना। माया भासे ब्रह्म भासेना ।
माया नासे ब्रह्म नासेना। कल्पांतकाळीं ।।४।।

माया रचे ब्रह्म रचेना। माया खचे ब्रह्म खचेना ।
माया रुचे ब्रह्म रुचेना। अज्ञानासी ।।५।।
माया उपजे ब्रह्म उपजेना। माया मरे ब्रह्म मरेना ।
माया धरे ब्रह्म धरेना। धारणेसी ।।६।।
माया फुटे ब्रह्म फुटेना। माया तुटे ब्रह्म तुटेना ।
माया विटे ब्रह्म विटेना। अविट तें ।।७।।
माया विकारी ब्रह्म निर्विकारी। माया सर्व करी ब्रह्म कांहींच न करी ।
माया नाना रूपें धरी। ब्रह्म तें अरूप ।।८।।
माया पंचभौतिक अनेक। ब्रह्म तें शाश्वत एक ।
मायाब्रह्माचा विवेक। विवेकी जाणती ।।९।।
माया लहान ब्रह्म थोर। माया असार ब्रह्म सार ।
माया अर्ति पारावार। ब्रह्मासि नाहीं ।।१०।।
सकळ माया विस्तारली। ब्रह्मस्थिति आच्छादिली ।
परी ते निवडून घेतली। साधुजनीं ।।११।।
गोंडाळ सांडून नीर घेइजे। नीर सांडून क्षीर सेविजे ।
माया सांडून अनुभविजे। परब्रह्म तैसें ।।१२।।
ब्रह्म आकाशा ऐसें निवळ। माया वसुंधरा डहुळ ।
ब्रह्म सूक्ष्म केवळ। माया स्थूळरूप ।।१३।।
ब्रह्म तें अप्रत्यक्ष असे। माया ते प्रत्यक्ष दिसे ।
ब्रह्म तें समचि असे। माया ते विषमरूप ।।१४।।
माया लक्ष्य ब्रह्म अलक्ष्य। माया साक्ष ब्रह्म असाक्ष ।
मायेमध्यें दोन्ही पक्ष। ब्रह्मीं पक्षचि नाहीं ।।१५।।
माया पूर्वपक्ष ब्रह्म सिद्धांत। माया असत् ब्रह्म सत् ।
ब्रह्मासि नाहीं करणें हित। मायेसि आहे ।।१६।।
ब्रह्म अखंड घनदाट। माया पंचभौतिक पोंचट ।
ब्रह्म तें निरंतर निघोट। माया ते जुनी जर्जरी ।।१७।।

माया घडे ब्रह्म घडेना। माया पडे ब्रह्म पडेना ।
माया विघडे ब्रह्म विघडेना। जैसें तैसें ।।१८।।
ब्रह्म असतचि असे। माया निरसितांच निरसे ।
ब्रह्मास कल्पांत नसे। मायेसि असे ।।१९।।
माया कठिण ब्रह्म कोमळ। माया अल्प ब्रह्म विशाळ ।
माया नसे सर्वकाळ। ब्रह्मचि असे ।।२०।।
वस्तु नव्हे बोलिजे ऐशी। माया जैशी बोलिजे तैशी ।
काळ पावेना वस्तूसी। मायेसी झडपी ।।२१।।
नाना रूप नाना रंग। तितुका मायेचा प्रसंग ।
माया भंगे ब्रह्म अभंग। जैसें तैसें ।।२२।।
आतां असो हा विस्तार। चालत जातें सचराचर ।
तितुकी माया परमेश्वर। सबाह्य अभ्यंतरीं ।।२३।।
सकळ उपाधींवेगळा। तो परमात्मा निराळा ।
जळीं असोन नातळे जळा। आकाश जैसें ।।२४।।
मायाब्रह्मांचें विवरण। करितां चुके जन्ममरण ।
संतांसि गेलिया शरण। मोक्ष लाभे ।।२५।।
अरे या संतांचा महिमा। बोलावया नाहीं सीमा ।
जयांचेनि जगदात्मा। अंतरींच होय ।।२६।।
हरिॐतत्सत् इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे
षष्ठदशके मायाब्रह्मनिरूपणं नाम पंचमः समासः ।।५।।६. ५
जय जय रघुवीर समर्थ ।।

---

समास सहावा : सृष्टीकथन
श्रीराम ।।
सृष्टीपूर्वींच ब्रह्म असे। तेथें सृष्टि मुळींच नसे ।
आतां सृष्टि दिसत असे। ते सत्य कीं मिथ्या ।।१।।
तुम्ही सर्वज्ञ गोसावी। माझी आशंका फेडावी ।

ऐसा श्रोता विनवी। वक्तयासी ||२||
आतां ऐका प्रत्युत्तर। कथेसि व्हावें तत्पर ।
वक्ता सर्वज्ञ उदार। बोलता जाहला ||३||
जीवभूतः सनातनः। ऐसें गीतेचें वचन ।
येणें वाक्यें सत्यपण। सृष्टीस आलें ||४||
यद्दृष्टं तन्नष्टं येणें-। वाक्यें सृष्टि मिथ्यापणें ।
सत्य मिथ्या ऐसें कोणें। निवडावें ||५||
सत्य म्हणों तरी नासे। मिथ्या म्हणों तरी दिसे ।
आतां जैसें आहे तैसें। बोलिजेल ||६||
सृष्टीमध्यें बहु जन। अज्ञान आणि सज्ञान ।
म्हणोनियां समाधान। होत नाहीं ||७||
ऐका अज्ञानाचें मत। सृष्टि आहे ते शाश्वत ।
देव धर्म तीर्थ व्रत। सत्यचि आहे ||८||
बोले सर्वज्ञांचा राजा। मूर्खस्य प्रतिमापूजा ।
ब्रह्मप्रळयाच्या पैजा। घालूं पाहे ||९||
तंव बोले तो अज्ञान। तरी कां करिसी संध्या स्नान ।
गुरुभजन तीर्थाटन। कासया करावें ||१०||
तीर्थे तीर्थे निर्मलं ब्रह्मवृन्दम्। वृन्दे वृन्दे
तत्त्वचिन्तानुवादः ।
वादे वादे जायते तत्त्वबोधः। बोधे बोधे भासते चन्द्रचूडः ||१||
ऐसें चन्द्रचूडाचें वचन। सद्गुरूचें उपासन ।
गुरुगीतानिरूपण। बोलिलें हरें ||११||
गुरूसि कैसें भजावें। आधीं तयासि ओळखावें ।
त्याचें समाधान घ्यावें। विवेकें स्वयें ||१२||
ब्रह्मानन्दं परमसुखदं केवलं ज्ञानमूर्तिम् द्वन्द्वातीतं
गगनसदृशं तत्त्वमस्यादिलक्ष्यम् ।
एकं नित्यं विमलमचलं सर्वधीसाक्षिभूतम् भावातीतं

त्रिगुणरहितं सद्गुरुं तं नमामि ||१||
गुरुगीतेचें वचन| ऐसें सद्गुरूचें ध्यान |
तेथें सृष्टि मिथ्या भान| उरेल कैंचें ||१३||
ऐसें सज्ञान बोलिला| सद्गुरु तो ओळखिला |
सृष्टि मिथ्या ऐसा केला| निश्चितार्थ ||१४||
श्रोता ऐसें न मानी कदा| अधिक उठिला विवादा |
म्हणे कैसा रे गोविंदा| अज्ञान म्हणतोसी ||१५||
जीवभूतः सनातनः| ऐसें गीतेचें वचन |
तयासि तूं अज्ञान| म्हणतोसि कैसा ||१६||
ऐसा श्रोता आक्षेप करी| विषाद मानिला अंतरीं |
याचें प्रत्युत्तर चतुरीं| सावध परिसावें ||१७||
गीतेंत बोलिला गोविंद| त्याचा न कळे तुज भेद |
म्हणोनियां व्यर्थ खेद| वाहतोसि ||१८||
अश्वत्थः सर्ववृक्षाणां| माझी विभूती पिंपळ| म्हणोनि बोलिला गोपाळ |
वृक्ष तोडितां तत्काळ| तुटत आहे ||१९||
नैनं छिंदंति शस्त्राणि नैनं दहति पावकः |
न चैनं क्लेदयन्त्यापो न शोषयति मारुतः ||१||
शस्त्रांचेनि तुटेना| अग्नीचेनि जळेना |
उदकामध्यें कालवेना| स्वरूप माझें ||२०||
पिंपळ तुटे शस्त्रानें| पिंपळ जळे पावकानें |
पिंपळ कालवे उदकानें| नाशवंत ||२१||
तुटे जळे बुडे उडे| आतां ऐक्य कैसें घडे |
म्हणोनि हें उजेडे| सद्गुरुमुखें ||२२||
इन्द्रियाणां मनश्चास्मि' | कृष्ण म्हणे मन तो मी |
तरी कां आवरावी ऊर्मी| चंचळ मनाची ||२३||
ऐसें कृष्ण कां बोलिला| साधनमार्ग दाखविला |

खडे मांडूनि शिकविला। ओनामा जेवीं ।।२४।।
ऐसा आहे वाक्यभेद। सर्व जाणे तो गोविंद ।
देहबुद्धीचा विवाद। कामा नये ।।२५।।
वेद शास्त्र श्रुति स्मृती। तेथें वाक्यभेद पडती ।
ते सर्वही निवडती। सद्गुरूचेनि वचनें ।।२६।।
वेदशास्त्रांचें भांडण। शस्त्रें तोडी ऐसा कोण ।
हें निवडेना साधुविण। कदा कल्पांतीं ।।२७।।
पूर्वपक्ष आणि सिद्धांत। शास्त्रीं बोलिला संकेत ।
याचा होय निश्चितार्थ। साधुमुखें ।।२८।।
येऱ्हवीं वादाचीं उत्तरें। एकाहूनि एक थोरें ।
बोलूं जातां अपारें। वेदशास्त्रें ।।२९।।
म्हणोनि वादविवाद। सांडूनि कीजे संवाद ।
तेणें होय ब्रह्मानंद। स्वानुभवें ।।३०।।
एके कल्पनेचे पोटीं। होती जाती अनंत सृष्टी ।
तया सृष्टीची गोष्टी। साच केवीं ।।३१।।
कल्पनेचा केला देव। तेथें झाला दृढ भाव ।
देवालागीं येतां खेव। भक्त दुःखें दुखवला ।।३२।।
पाषाणाचा देव केला। एके दिवशीं भंगोनि गेला ।
तेणें भक्त दुखवला। रडे पडे आक्रंदे ।।३३।।
देव हारपला घरीं। एक देव नेला चोरीं ।
एक देव दुराचारीं। फोडिला बळें ।।३४।।
एक देव जापाणिला। एक देव उदकीं टाकिला ।
एक देव नेऊन घातला। पायांतळीं ।।३५।।
काय सांगों तीर्थमहिमा। मोडोनि गेला दुरात्मा ।
थोर सत्व होतें तें मा। काय जाहलें कळेना ।।३६।।
देव घडिला सोनारीं। देव ओतिला ओतारीं ।
एक देव घडिला पाथरीं। पाषाणाचा ।।३७।।

नर्मदा गंडिकातीरीं। देव पडिले लक्षवरी ।
त्यांची संख्या कोण करी। असंख्यात गोटे ।।३८।।
चक्रतीर्थीं चक्रांकित। देव असती असंख्यात ।
नाहीं मनीं निश्चितार्थ। एक देव ।।३९।।
बाण तांदळे ताम्रनाणें। स्फटिक देव्हारां पूजणें ।
ऐसे देव कोण जाणे। खरे कीं खोटे ।।४०।।
देव रेशिमाचा केला। तोही तुटोनियां गेला ।
आतां नवा नेम धरिला। मृत्तिकेच्या लिंगाचा ।।४१।।
आमचा देव बहु सत्य। आम्हांस आकांतीं पावत ।
पूर्ण करी मनोरथ। सर्वकाळ ।।४२।।
आतां याचें सत्त्व गेलें। प्राप्त होतें तें झालें ।
प्राक्तन नवचे पालटिलें। ईश्वराचेनि ।।४३।।
धातु पाषाण मृत्तिका। चित्रलेप काष्ठ देखा ।
तेथें देव कैंचा मूर्खा। भ्रांति पडिली ।।४४।।
हे आपुलाली कल्पना। प्राक्तना- ऐशीं फळें जाणा ।
परी त्या देवाचिया खुणा। वेगळ्याचि ।।४५।।
नानाशास्त्रविदो लोका नानादैवतपूजकाः ।
आत्मज्ञानं विना पार्थ सर्वकर्म निरर्थकम् ।।१।।
म्हणोनि हें माया भ्रमणें। सृष्टि मिथ्या कोटिगुणें ।
वेद शास्त्रें पुराणें। ऐशींच बोलती ।।४६।।
साधु संत महानुभाव। त्यांचा ऐसाचि अनुभव ।
पंचभूतातीत देव। सृष्टि मिथ्या ।।४७।।
सृष्टीपूर्वीं सृष्टि चालतां। सृष्टि अवघी
संहारतां ।
शाश्वत देव तत्त्वतां। आदि अंतीं ।।४८।।
ऐसा सर्वांचा निश्चयो। यदर्थीं नाहीं संशयो ।
व्यतिरेक आणि अन्वयो। कल्पनारूप ।।४९।।

एके कल्पनेचे पोटीं। बोलिजेती अष्ट सृष्टि ।
तये सृष्टीची गोष्टी। सावध ऐका ।।५०।।
एक कल्पनेची सृष्टी। दुसरी शाब्दिक सृष्टी ।
तिसरी प्रत्यक्ष सृष्टी। जाणती सर्व ।।५१।।
चौथी चित्रलेप सृष्टी। पांचवी स्वप्नसृष्टी ।
साहावी गंधर्वसृष्टी। ज्वरसृष्टी सातवी ।।५२।।
आठवी दृष्टिबंधन। ऐशा अष्ट सृष्टि जाण ।
यांमध्ये श्रेष्ठ कोण। सत्य मानावी ।।५३।।
म्हणोन सृष्टी नाशवंत। जाणती संत महंत ।
सगुण भजावा निश्चित। निश्चयालागीं ।।५४।।
सगुणाचेनि आधारें। निर्गुण पाविजे निर्धारें ।
सारासारविचारें। संतसंगें ।।५५।।
आतां असो हें बहुत। संतसंगें केलें नेमस्त ।
येरवीं चित्त दुश्चित। संशयीं पडे ।।५६।।
तंव शिष्यें आक्षेपिलें। सृष्टी मिथ्या ऐसें कळलें ।
परी हें दृश्य अवघें नाथिलें। तरी दिसतें कां ।।५७।।
दृश्य प्रत्यक्ष दिसतें। म्हणोनि सत्यचि वाटतें ।
यासि काय करावें तें। सांगा स्वामी ।।५८।।
याचें प्रत्युत्तर भलें। पुढिले समासीं बोलिलें ।
श्रोतीं श्रवण केलें। पाहिजे पुढें ।।५९।।
एवं सृष्टि मिथ्या जाण। जाणोनि रक्षावें सगुण ।
ऐशी हे अनुभवाची खूण। अनुभवी जाणती ।।६०।।
हरि ॐ तत्सत् इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे
षष्ठदशके सृष्टिकथानिरूपणं नाम षष्ठः
समासः ।।६।।६. ६

---

समास सातवा : सगुणभजन

श्रीराम ||
ज्ञानें दृश्य मिथ्या झालें| तरी कां पाहिजे भजन केलें |
तेणें काय प्राप्त झालें| हें मज निरूपावें ||१||
ज्ञानाहून थोर असेना| तरी कां पाहिजे उपासना |
उपासनेनें जनां| काय प्राप्त ||२||
मुख्य सार तें निर्गुण| तेथें दिसेचिना सगुण |
भजन केलियाचा गुण| मज निरूपावा ||३||
जें प्रत्यक्ष नाशवंत| त्यासि भजावें किंनिमित्त |
सत्य सांडून असत्य| कोणें भजावें ||४||
असत्याचा प्रत्ययो आला| तरी मग नेम कां लागला |
सत्य सांडून गलबला| कासया करावा ||५||
निर्गुणानें मोक्ष होतो| प्रत्यक्ष प्रत्यय येतो |
सगुण काय देऊं पाहतो| सांगा स्वामी ||६||
सगुण नाशवंत ऐसें सांगतां| पुनः भजन करावें
म्हणतां |
तरी कासयासाठीं आतां| भजन करूं ||७||
स्वामीचे भिडेनें बोलवेना| येऱ्हवीं हें कांहींच मानेना |
साध्यचि झालिया साधना| कां प्रवर्तावें ||८||
ऐसें श्रोतयाचें बोलणें| शब्द बोले निर्बुजलेपणें |
याचें उत्तर ऐकणें| म्हणे वक्ता ||९||
सद्गुरु वचन प्रतिपालन| हेंचि मुख्य परमार्थाचें लक्षण |
वचनभंग करितां विलक्षण| सहजचि जाहलें ||१०||
म्हणोनि आज्ञेसि वंदावें| सगुण भजन मानावें |
श्रोता म्हणे हें देवें| कां प्रयोजिलें ||११||
काय मानिला उपकार| कोण झाला साक्षात्कार |
किंवा प्रारब्धाचें अक्षर| पुसिलें देवें ||१२||
होणार हें तों पालटेना| भजनें काय करावें जना.

हें तों पाहतां अनुमाना। कांहींच न ये ।।१३।।
स्वामीची आज्ञा प्रमाण। कोण करील अप्रमाण ।
परंतु याचा काय गुण। मज निरूपावा ।।१४।।
वक्ता म्हणे सावधपणें। सांग ज्ञानाची लक्षणें ।
तुज कांहीं लागे करणें। किंवा नाहीं ।।१५।।
करणें लागे भोजन। करणें लागे उदकप्राशन ।
मळमूत्रत्यागलक्षण। तेंही सुटेना ।।१६।।
जनाचें समाधान राखावें। आपुलें पारिखें ओळखावें ।
आणि भजनचि मोडावें। हें कोण ज्ञान ।।१७।।
ज्ञान विवेकें मिथ्या झालें। परंतु अवघें नाहीं टाकिलें ।
तरी मग भजनेंचि काय केलें। सांग बापा ।।१८।।
साहेबास लोटांगणीं जावें। नीचासारिखें व्हावें ।
आणि देवास न मानावें। हें कोण ज्ञान ।।१९।।
हरि हर ब्रह्मादिक। हे जयाचे आज्ञाधारक ।
तूं एक मानवी रंक। भजसि ना तरी काय गेलें ।।२०।।
आमुचे कुळीं रघुनाथ। रघुनाथ आमुचा परमार्थ ।
जो समर्थाचाही समर्थ। देवां सोडविता ।।२१।।
त्याचे आम्ही सेवकजन। सेवा करितां झालें ज्ञान ।
तेथें अभाव धरितां पतन। पाविजेल कीं ।।२२।।
सद्गुरु सांगती सारासार। त्यास कैसें म्हणावें असार ।
तुज काय सांगणें विचार। शाहाणे जाणती ।।२३।।
समर्थाचे मनींचें तुटे। तेंचि जाणावें अदृष्ट खोटें ।
राज्यपदापासून करंटें। चेवलें जैसें ।।२४।।
मी थोर वाटे मनीं। तो नव्हे ब्रह्मज्ञानी ।
विचार पाहतां देहाभिमानी। प्रत्यक्ष दिसे ।।२५।।
वस्तु भजन करीना। न करीं ऐसेंही म्हणेना ।
तरी जाणावी ती कल्पना। दडोन राहिली ।।२६।।

ना तें ज्ञान ना तें भजन। ठगाचि आला देहाभिमान ।
तेथें नाहीं कीं अनुमान। प्रत्ययो तुझा ।।२७।।
तरी आतां ऐसें न करावें। रघुनाथभजनीं लागावें ।
तेणेंचि ज्ञान बोलावें। चळेना ऐसें ।।२८।।
करी दुर्जनांचा संहार। भक्तजनांचा आधार ।
ऐसा हा चमत्कार। रोकडा चाले ।।२९।।
मनीं धरावें तें होतें। विघ्न अवघेंचि नासोनि जातें ।
कृपा केलिया रघुनाथें। प्रचीति येते ।।३०।।
रघुनाथभजनें ज्ञान झालें। रघुनाथभजनें महत्व
वाढलें ।
म्हणोनि तुवां केलें। पाहिजे आधीं ।।३१।।
हें तों आहे सप्रचीत। आणि तुज वाटेना प्रचित ।
साक्षात्कारें नेमस्त। प्रत्ययो करावा ।।३२।।
रघुनाथ स्मरोन कार्य करावें। तें तत्काळचि सिद्धि पावे ।
कर्ता राम हें असावें। अभ्यंतरीं ।।३३।।
कर्ता राम मी नव्हे आपण। ऐसें सगुण निवेदन ।
निर्गुणीं तें अनन्य। निर्गुणचि होइजे ।।३४।।
मी कर्ता ऐसें म्हणतां। कांहींच घडेना सर्वथा ।
प्रतीत पाहसी तरी आतां। शीघ्रचि आहे ।।३५।।
मी कर्ता ऐसें म्हणसी। तेणें तूं कष्टी होसी ।
राम कर्ता म्हणतां पावसी। यश कीर्ति प्रताप ।।३६।।
एके भावनेसाठीं। देवासि पडे तुटी ।
कां ते होय कृपादृष्टी। देव कर्ताभावितां ।।३७।।
आपण आहे दों दिवसांचा। आणि देव बहुतां काळांचा ।
आपण थोडे ओळखीचा। देवास त्रैलोक्य जाणे ।।३८।।
याकारणें रघुनाथ भजन। त्यासि मानिती बहुत जन ।
ब्रह्मादिक आदिकरून। रामभजनीं तत्पर ।।३९।।

ज्ञानबळें उपासना। अम्ही भक्त जरी मानूं ना ।
तरी या दोषाचिया पतना। पावों अभक्तपणें ।।४०।।
देव उपेक्षी थोरपणें। तरी मग त्याचें तोचि जाणे ।
अप्रमाण तें श्लाघ्यवाणें। नव्हेचि कीं श्रेष्ठा ।।४१।।
देहास लागली उपासना। आपण विवेकें उरेना ।
ऐशी स्थिति सज्जना। अंतरींची ।।४२।।
सकळ मिथ्या होऊन जातें। हें रामभजनें कळों येतें ।
दृश्य ज्ञानियांचें मतें। स्वप्न जैसें ।।४३।।
मिथ्या स्वप्नविवंचना। तैशी हे सृष्टिरचना ।
दृश्य मिथ्या साधुजनां। कळों आलें ।।४४।।
आक्षेप झाला श्रोतयांसी। मिथ्या तरी दिसतें कां आम्हासीं ।
याचें उत्तर पुढिलें समासीं। बोलिलें असे ।।४५।।
हरि ॐ तत्सत् इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे
षष्ठदशके सगुणभजननिरूपणं नाम सप्तमः समासः ।।७।।६. ७

---

समास आठवा : दृश्यनिरूपण
श्रीराम ।।
मागां श्रोतीं पुसिलें होतें। दृश्य मिथ्या तरी कां दिसतें ।
त्याचें उत्तर बोलिजेल तें। सावधान ऐका ।।१।।
देखिलें तें सत्यचि मानावें। हें ज्ञात्याचें देखणें नव्हे ।
जड मूढ अज्ञान जीवें। हें सत्य मानिजे ।।२।।
एका देखिल्यासाठीं। लटिक्या कराव्या ग्रंथकोटी ।
संतमहंतांच्या गोष्टी। त्याही मिथ्या मानाव्या ।।३।।
माझें दिसतें हेंचि खरें। तेथें चालेना दुसरें ।
ऐशिया संशयाच्या भरें। भरोंचि नये ।।४।।
मृगें देखिलें मृगजळ। तेथें धांवे तें बरळ ।
जळ नव्हे मिथ्या सकळ। त्या पशूसि कोणें म्हणावें ।।५।।

रात्रौ स्वप्न देखिलें। बहुत द्रव्य सांपडलें ।
बहुत जनांसि वेव्हारिलें। तें खरें कैसेनि मानावें ।।६।।
कुशळ चितारी विचित्र। तेणें निर्माण केलें चित्र ।
देखतां उठे प्रीति मात्र। परंतु तेथें मृत्तिका ।।७।।
नाना वनिता हस्ती घोडे। रात्रौ देखतां मन बुडे ।
दिवसा पाहतां कातडें। कंटाळवाणें ।।८।।
काष्ठी पाषाणी पुतळ्या। नाना प्रकारें निर्मिल्या ।
परम सुंदर वाटल्या। परंतु तेथें पाषाण ।।९।।
नाना गोपुरीं पुतळ्या असती। वक्रांगें वक्रदृष्टीं पाहती ।
लाघव देखता भरे वृत्ती। परंतु तेथें त्रिभाग ।।१०।।
खेळतां नेटके दशावतारी। तेथें येती सुंदर नारी ।
नेत्र मोडिती कळाकुसरीं। परी ते अवघे धटिंगण ।।११।।
सृष्टि बहुरंगी असत्य। बहुरूपाचें हें कृत्य ।
तुज वाटे दृश्य सत्य। परी हे जाण अविद्या ।।१२।।
मिथ्या साचासारिखें देखिलें। परी तें पाहिजे विचारिलें ।
दृष्टि तरळतां भासलें। तें साच कैसें मानावें ।।१३।।
वरी पाहतां पालथें आकाश। उदकीं पाहतां उताणें
आकाश ।
मध्यें चांदण्याचाही प्रकाश। परी तें अवघें मिथ्या ।।१४।।
नृपतीनें चितारी आणिले। ज्याचे त्या ऐसे पुतळे केले ।
पाहतां तेचि ऐसे गमले। परी ते अवघे मायिक ।।१५।।
नेत्रीं कांहीं बाहुली नसे। जेव्हां जें पहावें तेव्हां
तें भासे ।
डोळां प्रतिबिंब दिसे। तें साच कैसेनी ।।१६।।
जितुके बुडबुडे उठती। तितुक्यांमध्यें रूपें दिसती ।
क्षणामध्यें फुटोनि जाती। रूपें मिथ्या ।।१७।।
लघुदर्पणें दोनी चारी होतीं। तितुकीं मुखें प्रतिबिंबती ।

परी तीं मिथ्या आदिअंतीं। एकचि मुख ।।१८।।
नदीतीरीं भार जातां। दुसरा भार दिसे पालथा ।
कां पडसादाचा अवचितां। गजर उठे ।।१९।।
वापी सरोवरांचें नीर। तेथें पशु पक्षी नर वानर ।
नाना पत्रें वृक्ष विस्तार। दिसे दोहीं सवां ।।२०।।
एक शस्त्र झाडूं जातां। दोन दिसती तत्त्वतां ।
नाना तंतु टणत्कारितां। द्विधा भासती ।।२१।।
कां ते दर्पणाचे मंदिरीं। बैसली सभा दिसे दुसरी ।
बहुत दीपांचिये हारीं। बहुत छाया दिसती ।।२२।।
ऐसें हें बहुविध भासे। साचासारिखें दिसे ।
परी हें सत्य म्हणोन कैसें। विश्वासावें ।।२३।।
माया मिथ्या बाजीगिरी। दिसे साचाचिये परी ।
परी हे जाणत्यानें खरी। मानूंचि नये ।।२४।।
लटिकें साचा ऐसे भावावें ।तरी मग पारखी कासया असावें ।
एवं ये अविद्येचे गोवें। ऐसेचि असती ।।२५।।
मनुष्यांची बाजीगिरी। बहुत जनां वाटे खरी ।
शेवट पाहतां निर्धारीं। मिथ्या होय ।।२६।।
तैशीच माव राक्षसांची। देवांसही वाटे साची ।
पंचवटिकेसि मृगाची। पाठी घेतली रामें ।।२७।।
पूर्वकाया पालटिती। एकाचेचि बहुत होती ।
रक्तबिंदीं जन्मती। रजनीचर ।।२८।।
नाना पदार्थ फळेंचि झाले। द्वारकेमध्यें प्रवेशले ।
कृष्णें दैत्य किती वधिले। कपटरूपी ।।२९।।
कैसें कपट रावणाचें। शिर केलें मावेचें ।
काळनेमीच्या आश्रमाचें। अपूर्व कैसें ।।३०।।
नाना दैत्य कपटमती। जे देवांसही नाटोपती ।
मग निर्माण होऊन शक्ती। संहार केला ।।३१।।

ऐसी राक्षसांची माव। जाणों न शकती देव ।
कपटविद्येचें लाघव। अघटित ज्यांचें ।।३२।।
मनुष्यांची बाजीगिरी। राक्षसांची वोडंबरी ।
भगवंताची नानापरी। विचित्र माया ।।३३।।
हे साचासारिखीच देइसे। विचारितांचि निरसे ।
मिथ्याच परी आभासे। निरंतर ।।३४।।
साच म्हणावी तरी हे नासे। मिथ्या म्हणावी तरी हे दिसे ।
दोहीं पदार्थीं अविश्वासे। सांगतां मन ।।३५।।
परंतु हें नव्हे साचार। मायेचा मिथ्या विचार ।
दिसतें हें स्वप्नाकार। जाण बापा ।।३६।।
तथापि असो तुजला। भासचि सत्य वाटला ।
तरी तेथें चुका पडिला। ऐक बापा ।।३७।।
दृश्यभास अविद्यात्मक। तुझाही देह तदात्मक ।
म्हणोनि हा विवेक। तेथें संचरला ।।३८।।
दृष्टीनें दृश्य देखिलें। मन भासावरी बैसलें ।
परी तें लिंगदेह झालें। अविद्यात्मक ।।३९।।
अविद्येनें अविद्या देखिली। म्हणोन गोष्टी विश्वासली ।
तुझी काया अवघी संचली। अविद्येची ।।४०।।
तेचि काया मी आपण। हें देहबुद्धीचें लक्षण ।
येणेंकरितां झालें प्रमाण। दृश्य अवघें ।।४१।।
इकडे सत्य मानिला देह। तिकडे दृश्य सत्य हा निर्वाह ।
दोंहींमध्यें हा संदेह। पैसावला बळें ।।४२।।
देहबुद्धी केली बळकट। आणि ब्रह्म पाहों गेला धीट ।
तों दृश्यानें रोधिली वाट। परब्रह्माची ।।४३।।
तेथें साच मानिलें दृश्याला। निश्चयचि बाणोनि गेला ।
पहा हो केवढा चुका पडिला। अकस्मात ।।४४।।
आतां असो हें बोलणें। ब्रह्म न पाविजे मीपणें ।

देहबुद्धीची लक्षणें। दृश्य भाविती ।।४५।।
अस्थींच्या देहीं मांसाचा गोळा। पाहेन म्हणे
ब्रह्मींचा सोहळा ।
तो ज्ञाता नव्हे आंधळा। केवळ मूर्ख ।।४६।।
दृष्टीस दिसे मनास भासे। तितुकें काळांतरीं नासे ।
म्हणोनि दृश्यातीत असे। परब्रह्म तें ।।४७।।
परब्रह्म तें शाश्वत। माया तेचि अशाश्वत ।
ऐसा बोलिला निश्चितार्थ। नानाशास्त्रीं ।।४८।।
आतां पुढें निरूपण। देहबुद्धीचें लक्षण ।
चुका पडिला तो कोण। बोलिलें असे ।।४९।।
मी कोण हें जाणावें। मीपण त्यागून अनन्य व्हावें ।
मग समाधान तें स्वभावें। अंगीं बाणे ।।५०।।
हरिः ॐ तत्सत् इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे
षष्ठदशके दृश्यनिरसनं नाम अष्टमः समासः ।।८।।६. ८

---

श्री रघुवीर समर्थ ।।
समास नववा : सारशोधन
श्रीराम ।।
गुप्त आहे उदंड धन। काय जाणती सेवकजन ।
तयांस आहे तें ज्ञान। बाह्याकाराचें ।।१।।
गुप्त ठेविले उदंड अर्थ। आणि प्रगट दिसती पदार्थ ।
शहाणे शोधिति स्वार्थ। अंतरीं असे ।।२।।
तैसें दृश्य हें मायिक। पाहत असती सकळ लोक ।
परी जयांस ठाउका विवेक। ते अंतर जाणती ।।३।।
द्रव्य ठेऊन जळ सोडिलें। लोक म्हणती सरोवर भरलें ।
तयाचें अभ्यंतर कळलें। समर्थ जनांसी ।।४।।
तैसे ज्ञाते जे समर्थ। तिहीं ओळखिला परमार्थ ।

इतर ते करिती स्वार्थ। दृश्य पदार्थांचा ||५||
काबाडी वाहती काबाड। श्रेष्ठ भोगिती रत्नें जाड |
हें जयांचें त्यांस गोड। कर्मयोगें ||६||
एक काष्ठस्वार्थ करिती। एक शुभा एकवटिती |
तैसे नव्हेत कीं नृपती। सारभोक्ते ||७||
जयांस आहे विचार। ते सुखासनीं झाले स्वार |
इतर ते जवळील भार। वाहतचि मेले ||८||
एक दिव्यान्नें भक्षिती। एक विष्ठा सावडिती |
आपण वर्तल्याचा घेती। साभिमान ||९||
सार सेविजे श्रेष्ठीं। असार घेइजे वृथापुष्टीं |
सारासाराची गोष्टी। सज्ञान जाणती ||१०||
गुप्त परिस चिंतामणी। प्रगट खडे काचमणी |
गुप्त हेम रत्नखाणी। प्रगट पाषाण मृत्तिका ||११||
अव्हाशंख अव्हावेल। गुप्त वनस्पती अमूल्य |
एरंड धोत्रे बहुसाल। प्रगट शिंपी ||१२||
कोठें दिसेना कल्पतरू। उदंड शेरांचा विस्तारू |
पाहतां नाहीं मैलागरू। बोरी बाभळी उदंड ||१३||
कामधेनु जाणिजे इंद्रें। सृष्टींत उदंड खिल्लारें |
महद्भाग्य भोगिजे नृपवरें। इतरां कर्मानुसार ||१४||
नाना व्यापार करिती जन। अवघेच म्हणती सकांचन |
परंतु कुबेराचें महिमान। कोणासीच न ये ||१५||
तैसा ज्ञानी योगीश्वर। गुप्तार्थलाभाचा ईश्वर |
इतर ते पोटाचे किंकर। नाना मतें धुंडिती ||१६||
तस्मात् सार तें दिसेना। आणि असार तें दिसे जनां |
सारासारविवंचना। साधु जाणती ||१७||
दिसेना जें गुप्त धन। तयास करणें लागे अंजन |
गुप्त परमात्मा सज्जन। संगतीं शोधावा ||१९||

